**जलसंपदा विभागाकडील पूर्वीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सेवेस जोडून देणेबाबत...**

**श्री. तुषार अरुण बुरुड, अधीक्षक अभियंता.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०२३/प्र.क्र.९८/सेवा-१,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २७ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**
१. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.नियुक्ती-११०७/(९९/२००७)/आ(सअश्रे-२, दि.०७.०९.२००७.
२. श्री. तु. अ. बुरुड, तत्का. सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) यांचा अर्ज, दि.१७.११.२००७.
३. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.जीएबी-२०१०/प्र.क्र.११२/का.सेवा-२, दि.१०.०८.२०१०.
४. कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण विभाग, चंद्रपूर यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था-१/१३०५/२०१०, दि.२७.०१.२०१०.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.सीएफएन-२०१३/१०/सेवा-२, दि.०९.१०.२०१३.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.स्थायित्व-२०१९/प्र.क्र.२९२/सेवा-२, दि.१२.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागाच्या संदर्भाधीन दि.०७.०९.२००७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री. तुषार अरुण बुरुड (अ.जा.) (म.लो.आ. गु.क्र.१६२) यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केल्यानुसार, जलसंपदा विभागात महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२ मध्ये **"सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)"** या पदावर रु.६५००-२००-१०५०० या वेतनश्रेणीत ते हजर होतील त्या दिनांकास नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार, श्री. बुरुड हे सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावर **दि.०६.११.२००७ (म.पू.)** रोजी हजर झाले होते.

**२.** श्री. बुरुड हे सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावर जलसंपदा विभागांतर्गत पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण, उपविभाग क्र.१, चंद्रपूर येथे कार्यरत असतांना, त्यांनी संदर्भाधीन दि.१७.११.२००७ रोजीच्या अर्जान्वये, महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेतल्या जाणाऱ्या महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परीक्षा-२००७ करिता अर्ज सादर करण्याबाबत त्या कार्यालयास कळविले होते. त्यानुसार, अधीक्षक अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण मंडळ, नागपूर यांनी श्री. बुरुड यांना सदरहू परिक्षेस बसण्यास परवानगी दिली होती.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.१०.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री.तु. अ. बुरुड, सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) यांची सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-अ मधील **"सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ"** या पदावर, महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून, सरळसेवेने रु.१५६००-५४००-३९१०० या वेतनश्रेणीमध्ये दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली.

४. त्यानुसार, कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण विभाग, चंद्रपूर यांच्या संदर्भाधीन दि.२७.०१.२०१० रोजीच्या आदेशान्वये, श्री. बुरुड, सहायक अभियंता, श्रेणी-२ (स्थापत्य) यांना सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ मधील सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ या पदावर रुजू होण्याकरिता, **दि.३१.०८.२०१० (म.नं.)** रोजी कार्यमुक्त करण्यात आले होते. त्यानुसार, श्री. बुरुड हे सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ या पदावर **दि.०१.०९.२०१० (म.पू.)** रोजी महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी महाविद्यालय, नाशिक येथे दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी रुजू झाले.

५. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.०९.१०.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, श्री.बुरुड, सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ (अ.क्र.४) यांचा दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.३१.०८.२०१२ रोजी संपुष्टात आणून, दि.०१.०९.२०१२ पासून त्यांच्या सेवा दिर्घ मुदतीसाठी पुढे चालू ठेवण्यात आल्या आहेत.

६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०२.२०२० रोजीच्या आदेशान्वये, श्री. बुरुड (अ.क्र.२९) यांना दि.०१.०९.२०१३ पासून आवश्यक त्या सर्व प्रयोजनार्थ स्थायी शासकीय कर्मचारी म्हणून समजले जाण्यास पात्र ठरविण्यात आले आहे.

७. श्री. बुरुड, अधीक्षक अभियंता यांची जलसंपदा विभागाकडील सेवा ही राज्य शासनाची सेवा असून, ते पूर्वीच्या सेवेतून रितसर कार्यमुक्त झाले आहेत. तसेच, त्यांच्या जलसंपदा विभागाकडील व सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सेवेत कोणताही खंड पडलेला नाही. सबब, श्री. बुरुड, अधीक्षक अभियंता यांची जलसंपदा विभागाकडील "सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावरील दि.०६.११.२००७ ते दि.३१.०८.२०१० (दोन्ही दिवस धरुन) या कालावधीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील, "सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ" या पदावरील दि.०१.०९.२०१० (म.पू.) पासूनच्या सेवेस जोडून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री. तुषार अरुण बुरुड, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर यांची जलसंपदा विभागाकडील पूर्वीची "सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)" या पदावरील दि.०६.११.२००७ ते दि.३१.०८.२०१० (दोन्ही दिवस धरुन) या कालावधीची सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील, "सहाय्यक कार्यकारी अभियंता, गट-अ" या पदावरील दि.०१.०९.२०१० (म.पू.) पासूनच्या सेवेस फक्त सेवानिवृत्ती उपदानाच्या प्रयोजनार्थ जोडून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. बुरुड, अधीक्षक अभियंता यांच्या वेतननिश्चितीबाबत, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. श्री. बुरुड, अधीक्षक अभियंता यांची पूर्वीची जलसंपदा विभागाकडील रजा विद्यामान सेवेस जोडून देणेबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-२१ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. सदरचा शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३४६/सेवा-७, दि.२६.०९.२०२४, अनौपचारिक संदर्भ क्र.३९४/२४/सेवा-३, दि.२३.१०.२०२४ व अनौपचारिक संदर्भ क्र.२७२/२४/सेवा-६, दि.२८.११.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२२७१६२३१७२११८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANAGHA ABHAY JAWALE

Digitally signed by ANAGHA ABHAY JAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1b2d80236ea086889a45c2dcd2bcbeeb1963360ef86a463c0a11f7be167e68eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F265FDD947D3EB873F7094E1B871AF8C32B21F87C2B270064CF1A727E47C456D, cn=ANAGHA ABHAY JAWALE
Date: 2025.02.27 16:24:20 +05'30'

**(अनघा अभय जावळे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. **श्री. तुषार अरुण बुरुड, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर,** यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्यामार्फत.

२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.

प्रत :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, कोल्हापूर/पुणे.
३. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. कक्ष अधिकारी {आ.(स.अ.श्रेणी-२)}, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. कक्ष अधिकारी (सेवा-७ / सेवा-३ / सेवा-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कक्ष अधिकारी (आस्था-१/आस्था-२/सेवा-२/सेवा-३/सेवा-६, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती / सेवा-१.